**भटके विमुक्त प्रतिष्ठान,सोलापूर या संस्थेच्या मंगळूर (यमगरवाडी) ता.तुळजापूर,जि. उस्मानाबाद येथे कार्यरत असणाऱ्या विजाभज प्रवर्गाच्या प्राथमिक आश्रमशाळेस जोडून निवासी माध्यमिक आश्रमशाळा शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारीवृंदासह विशेष बाब म्हणून मंजूर करणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक:- विभशा २०१५/प्र.क्र.२८४/विजाभज-२**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०००३२
दिनांक : १ डिसेंबर, २०१६

संदर्भ: १) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग. क्र. विभशा २००२/प्र.क्र ३९/मावक-६, दि. १६.१०.२००३.

२) प्रादेशिक उपायुक्त समाज कल्याण, लातूर यांचे पत्र क्र. प्राउसकवि/लातूर/आशा/का/४(२)/विजाभज आश्रमशाळा/सन २०१५-१६/३६५४,दि. १२.८.२०१५.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्रातील विमुक्त जाती, भटक्या जमाती संवर्गातील व्यक्ती आपला उदरनिर्वाह करण्यासाठी कायम स्थलांतर करीत असतात. त्यांच्या मुलांना शिक्षणापासून वंचित रहावे लागते. अशा मुलांच्या शिक्षणाची सोय करण्यासाठी स्वतंत्र विजाभज आश्रमशाळा अनुदान देऊन स्वयंसेवी संस्थामार्फत सुरु करण्याची योजना सन १९५३-५४ पासून सुरु करण्यात आली. सद्य:स्थितीत राज्यात विजाभज मुला-मुलींसाठी ५२६ प्राथमिक आश्रमशाळा, २९६ माध्यमिक आश्रमशाळा, १४८ उच्च माध्यमिक आश्रमशाळा, १ विद्यानिकेतन, ४ ऊसतोड कामगाराच्या मुलांसाठी आश्रमशाळा अशा एकूण ९७५ आश्रमशाळा कार्यरत आहे. या सर्व आश्रमशाळा खाजगी संस्थाना अनुदान देऊन चालविण्यात येतात.

२. उस्मानाबाद जिल्ह्यात विजाभज प्रवर्गाच्या १९ प्राथमिक, ११ माध्यमिक व ७ उच्च माध्यमिक अशा एकूण ३७ आश्रमशाळा कार्यरत आहेत. यामध्ये भटक्या विमुक्त विकास प्रतिष्ठान संचलित प्राथमिक आश्रमशाळा यमगरवाडी, ता.तुळजापूर, जि.उस्मानाबाद या आश्रमशाळेचा समावेश आहे.

३. सदर आश्रमशाळा सन १९९६ पासून सुरू असून इयत्ता १ ते ७ वी ची शाळा कार्यरत आहे. सद्य:स्थितीत सदर आश्रमशाळेत २२० मुले व १४० मुली असे एकूण ३६० विद्यार्थी शिक्षण घेत आहे. त्याचप्रमाणे ४५ मुले व ३५ मुली असे एकूण ८० विद्यार्थी इ. ८ वी, ९ वी व १० वी चे शिक्षण घेत आहे. यापैकी १२० विद्यार्थ्यांना शासकीय अनुदान प्राप्त होते. उर्वरित २४० विद्यार्थ्यांचा निवास, भोजन, आरोग्य व इतर सर्व खर्च संस्थेमार्फत केला जातो. सदर संस्था हा खर्च मागील १९ वर्षापासून करीत आहे. संस्थेच्या इ. १ ते ७ वी च्या वर्गास शासनाची मंजूरी आहे. त्या पुढील वर्गास म्हणजेच इ.८ वी ते १० वी निवासी माध्यमिक आश्रमशाळेस मंजूरी देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयामधील परिशिष्ट-१ ते ४ येथे नवीन विजाभज आश्रमशाळांना मान्यता देण्यासंदर्भात नमूद केलेल्या सर्व अटी व शर्तींची पूर्तता भटके विमुक्त प्रतिष्ठान, सोलापूर ही संस्था करील, या अटीवर भटके विमुक्त प्रतिष्ठान, सोलापूर या संस्थेच्या यमगरवाडी ता.तुळजापूर, जि.उस्मानाबाद येथील प्राथमिक आश्रमशाळेस जोडून इ. ८ वी सह माध्यमिक आश्रमशाळा सन २०१६-१७ या आर्थिक वर्षापासून **विशेष बाब** म्हणून मंजूर करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर माध्यमिक निवासी आश्रमशाळेसाठी खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे एकूण १४ पदांचा प्रस्ताव उच्चस्तरीय समितीच्या मान्यतेसाठी सादर करण्यात येईल व समितीने मान्यता दिल्यानंतर या पदनिर्मितीस मंजूरी देण्यात येईल.

| अ.क्र. | विजाभज आश्रमशाळा पद | पद संख्या |
|---|---|---|
| **अ** | **माध्यमिक विजाभज आश्रमशाळा** | |
| १ | मुख्याध्यापक | १ |
| २ | शिक्षण सेवक | ४ |
| ३ | कनिष्ठ लिपिक | १ |
| ४ | प्रयोगशाळा परिचर | १ |
| ५ | शिपाई | ३ |
| ६ | वसतीगृह महिला अधिक्षक | १ |
| ७ | स्वयंपाकी | १ |
| ८ | मदतनीस | १ |
| ९ | कामाठी | १ |
| | **एकूण** | **१४** |

३. सद्य:स्थितीत माध्यमिक आश्रमशाळा सुरु असल्याने या शाळेमध्ये सध्या कार्यरत असलेले शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी त्या पदाची अर्हता व इतर अटी व शर्ती पूर्ण करीत असतील तर त्यांचे उपरोक्त पदांमध्ये समायोजन करण्यात यावे. अन्यथा अतिरिक्त कर्मचा-यांमधून सदर पदे भरण्यात यावीत. शासनाच्या प्रचलित धोरणानुसार अतिरिक्त कर्मचाऱ्यांमधून शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी उपलब्ध न झाल्यास सक्षम प्राधिकाऱ्यांची मंजुरी घेऊन नियमानुसार पदे भरण्यात यावी.

४. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. एन-३ २२२५,अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण (०३) मागासवर्गीयांचे कल्याण-२७७ शिक्षण (०१) निराधिसूचित जमाती व भटक्या जमाती यांचे कल्याण (आश्रमशाळा) (०१) (०१) स्वयंसेवी संस्थाना आश्रमशाळा व मुलोगोद्योत्तर आश्रमशाळा चालविण्यासाठी सहाय्यक अनुदान (२२२५ ०७५३) योजनेतर योजना-३१ सहाय्यक अनुदाने(वेतनेत्तर), ३६ सहायक अनुदाने (वेतन) या लेखाशीर्षाखाली त्या-त्या वर्षी मंजूर झालेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६१२०११२२७३३४०२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्याचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jalandhar Madhav Gosavi

Digitally signed by Jalandhar Madhav Gosavi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=010ebf10ad01f09c23969e1d80b48a44066a9122f464e555f80af35b24d57d93, cn=Jalandhar Madhav Gosavi
Date: 2016.12.01 12:32:02 +05'30'

**(जा.मा.गोसावी)**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव,राजभवन,मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुंबई
३) मा. मंत्री (सा. न्या.व वि.स.) यांचे खाजगी सचिव, मुंबई
४) मा.राज्यमंत्री (सा. न्या.व वि.स.) यांचे खाजगी सचिव, मुंबई
५) मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक
६) अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव, वित्त विभाग,मंत्रालय मुंबई.
७) अप्पर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग,मंत्रालय,मुंबई.
८) प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) आयुक्त, समाजकल्याण , महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) आयुक्त, अपंगकल्याण आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
१४) संचालक, विजाभज,इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१५) विभागातील सर्व सह सचिव/उपसचिव, मंत्रालय, मुंबई-३२
१६) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग
१७) सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण
१८) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१९) सहसंचालक (सुधारणा) लेखा व कोषागारे,मुंबई.
२०) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता,महाराष्ट्र (मुंबई/नागपूर)
२१) महालेखापाल, लेखापरिक्षा, महाराष्ट्र (मुंबई/नागपूर)
२२) जिल्हा कोषागार अधिकारी, उस्मानाबाद.
२३) अध्यक्ष/सचिव, भटके विमुक्त प्रतिष्ठान,७९४,दक्षिण कसबा, शिवस्मारक जवळ, सोलापूर.
२४) निवडनस्ती, कार्यासन-विजाभज-२